**अंशत: ठाणबंद पध्दतीने लाभार्थ्यांना १०+१ शेळी गटाचे वाटप (कार्यक्रम) या योजनेकरिता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत.**
**(लेखाशिर्ष २४०३डी७४९)**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- १९ जुलै, २०२३

**वाचा :-** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३

२) कृषि व पदुम विभाग नस्ती क्र.पविआ-१०२३/प्र.क्र २०६/पदुम-३,

**शासन निर्णय :-**

अंशत: ठाणबंद पध्दतीने लार्भार्थींना १०+१ शेळी गटाचे वाटप (कार्यक्रम) या योजनेसाठी अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २४०३-पशुसंवर्धन, (००) (७८९)-अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१) (१५) अंशत: ठाणबंद पध्दतीने लाभार्थ्यांना १०+१ शेळी गटाचे वाटप (कार्यक्रम) (२४०३डी७४९) यालेखाशिर्षाखाली रु.२०००.०० लाख इतका नियतव्यय मंजूर आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. त्यानुसार संदर्भ क्र. २ येथील वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेच्या अधीन राहून कृषी व पदुम विभागाच्या नस्तीवर ठाणबंद पध्दतीने लार्भार्थींना १०+१ शेळी गटाचे वाटप (कार्यक्रम) या योजनेसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पीत निधीपैकी (२४०३डी७४९) या लेखाशिर्षाखाली रु.२००.०० लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, कृषी व पदुम विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५८७/२०२३, दि.१५.०६.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७१९११३००३७२२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, pseudonym=81399435626E9FEA18299D95CAA243F02DC0029F, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2023.07.25 15:16:13 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सचिव, कृषी व पदुमण विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कृषी व पदुम विभाग (पदुम-३), मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.